सहकार खात्यातील दक्षता कक्षासाठी असलेल्या ६ अस्थायी पदांना दिनांक १/९/२०२० ते दिनांक २८/२/२०२१ पर्यत मुदतवाढ देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन,**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग,**
**शासन निर्णय क्र. राजस २०२०/ प्र.क्र. ५९/ ५ स,**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक :- १४ सप्टेंबर,२०२०

वाचा :-

१) शासन निर्णय,सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग, क्र.राजस- ००८४/प्र.क्र.५३८/५-स, दि.५/५/२०११
२) शासन निर्णय सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.राजस २०२०/प्र.क्र.५९/५-स, दि.१२/३/२०२०
३) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्थापना/ कक्ष-४/ दक्षता कक्ष/ अस्थायी पदे / मुदत वाढ /५६९/ २०२० , दि.३१/७/२०२०
४) वित्त विभाग शासन निर्णय क्र.पदनि २०१६/प्र.क्र.०८/१६/आपुक,दि.३१/८/२०२०

शासन निर्णय :-

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या संदर्भाधिन क्र.३ येथील दि.३१/७/२०२० च्या पत्रान्वये सहकार खात्यातील दक्षता कक्षासाठी असलेल्या ६ अस्थायी पदांना दिनांक १/९/२०२० ते दिनांक २८/२/२०२१ या कालावधीसाठी मुदतवाढ देण्याची विनंती करण्यात आली आहे. संदर्भाधिन क्र.२ येथील दि.१२/३/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये सदर पदांना दि.२९/०२/२०२० पर्यंत मुदत वाढ देण्यात आली होती.

प्रशासकीय कारणास्तव सदरची पदे पुढे चालू ठेवणे आवश्यक असल्याने पुढील ६ अस्थायी पदांना दिनांक १/९/२०२० ते दिनांक २८/२/२०२१ पर्यत पुढे चालू ठेवण्यास शासन मान्यता देत आहे.

| अ.क्र | पद | पदांची संख्या |
|---|---|---|
| १ | सहायक निबंधक, सहकारी संस्था | १ |
| २ | लघुटंकलेखक (वेतनश्रेणी रु.५२००-२०२००, ग्रेड पे रु.१९००/-) | १ |
| ३ | कनिष्ठ लिपिक- टंकलेखक | २ |
| ४ | शिपाई | २ |
| | **एकूण** | ६ |

२. सदरहू पदांवर होणारा खर्च "मागणी क्र. व्ही-२ २४२५ -सहकार,००१ संचालन व प्रशासन (०१)(०१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, ( द. २४२५ ००११)" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व त्या लेखाशिर्षाखालील सन २०२०-२०२१ च्या मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर शासननिर्णय वित्त विभागाच्या दिनांक ३१/८/२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक २०२००९१५११४८५१८९०२ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Manjiri
Ganeshbhushan Joshi

Digitally signed by Manjiri Ganeshbhushan Joshi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation Marketing and Textiles Department, postalCode=400032, st=MAHARASHTRA, 2.5.4.20=91b4708db2a52d675f7f30d81444f3844833dfc7c86d4244ee107 5c97c713180, serialNumber=7d5731d128ab41d6a090557a2e9658b7382ac03af6e239ba 66cc1cf9a6cf2f52, cn=Manjiri Ganeshbhushan Joshi
Date: 2020.09.15 11:50:31 +05'30'

**( मं.ग.जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१) सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
२) उपनिबंधक, सहकारी संस्था (दक्षता कक्ष), पुणे,
३) महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई (लेखापरीक्षा / लेखा व अनुज्ञेयता),
४) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
५) वित्त विभाग (कार्यासन क्र. व्यय-२/अर्थसं-१९/ वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई,
६) अवर सचिव (कार्यासन १७-स) , सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
७) निवड नस्ती.